**साधना साप्ताहिकाच्या हिरक**
**महोत्सवाच्या निमित्ताने**
**आश्वासित केलेल्या अर्थसहाय्याचा**
**अंतीम हप्ता मंजूर**
**करणेबाबत.**

महराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक - योजना -२००९/२२८/प्र.क्र.२५/३४
मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
दिनांकः- ११ नोव्हेंबर, २००९.

वाचाः- १) शासन निर्णय क्रमांक- योजना-२००६/५३५/प्र.क्र.६५/३४,
दिनांक ११/७/२००७.
२) शासन निर्णय क्रमांक- योजना-२००६/५३५/प्र.क्र.६५/३४,
दिनांक १५/१२/२००७

**प्रस्तावनाः-**

साधना साप्ताहिकाच्या हिरक महोत्सवाच्या निमित्ताने आखलेल्या विविध योजनांसाठी शासनाकडुन रू.१.०० कोटी इतके अनुदान देण्याबाबतची साधना ट्रस्ट, पुणे या संस्थेची विनंती मान्य करण्यात आली होती. त्यानुसार सदर संस्थेस रु. ५१.०० लाख दोन हप्त्यामध्ये रुपये २६.०० लाख व रुपये २५ लाख अनुक्रमे १ व २ च्या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आले होते. आता उर्वरीत रू. ४९.०० लाख इतके अनुदान मंजूर करण्याच्या अनुषंगाने विधानमंडळाच्या जून २००९ च्या अधिवेशनात सादर केलेली पूरवणी मागणी मंजूर झाली असून सदरचे अनुदान संबंधित संस्थेस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णयः-**

साधना साप्ताहिकाच्या हिरक महोत्सवाच्या निमित्ताने आखलेल्या विविध योजनांसाठी रु. १.०० कोटी अर्थसहाय्यापैकी अंतीम हप्त्याची रक्कम रू. ४९,००,०००/- (रूपये एकोणपन्नास लक्ष फक्त) खालील अटीच्या अधीन राहून अदा कराण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१) शासनाकडून मंजूर झालेल्या रु. ४९.०० लक्ष अनुदान स्वीकृतीची पावती साधना ट्रस्ट्र , पुणे या संस्थेने शासनास सादर करावी.

२) निधी ज्या प्रयोजनासाठी मंजूर केला आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च केल्याचा तपशिल संस्थेने सादर करावा.

३) मंजूर अनुदानाचा विनियोग केल्याबद्दल सनदी लेखापालाने प्रमाणित केलेले उपयोगिता प्रमाणपत्र व त्यासोबत खर्चाचे लेखापरिक्षीत विवरणपत्र (ऑडिटेड स्टेटमेंटस्ट ऑफ अकाऊन्टस) सादर करणे संस्थेवर बंधनकारक राहिल.

२. वरील प्रयोजनासाठी होणारा खर्च सामान्य प्रशासन विभाग मागणी क्रमांक ए-६, २२२० माहिती व प्रसिध्दी, ०१ चित्रपट , ००१ संचालन व प्रशासन (००)(०१) प्रसिध्दी संचालक (योजनेतर )३१ सहायक अनुदान (२२२० ००४३) या लेखाशीर्षाखाली मंजूर झालेल्या तरतूदीतून मासिक निधी वितरणाच्या मर्यादेत भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५१७/०९/अर्थ-१४ दि. ०९.११.२००९ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेतांक क्र. २००९१११२१७०११०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

सही/-
( आ.म.लुडबे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखापरीक्षा) मुंबई,
अधिदान व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई ( २ प्रती ),
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
संचालक,(माहिती ) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
सहाय्यक संचालक, (जाहिरात )माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
लेखाधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई ,(५ प्रती)
वित्त विभाग (अर्थसंकल्प १४, व्यय-४)
डॉ.नरेंद्र दाभोलकर, विश्वस्त सचिव साधना ट्रस्ट आणि संपादक साधना साप्ताहिक,
४३१ , शनिवार पेठ, पुणे - ४११ ०३०.
स्वीय सहायक सचिव(मा.व ज.)
स्वीय सहायक, उप सचिव (मा.व ज.)
निवड नस्ती (कार्यासन ३४)